नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत उमरेड जि.नागपूर (सन २०१६-१७).

महाराष्ट्र शासन

अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांकः गोदाबां १०१२/१५५७/प्र.क्र.२३२/नापु-१६ ब

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२

तारीख: २० मार्च, २०१७.

वाचा-

१. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१२/१०२४/प्र.क्र.२३२/नापु-१६-ब, दि.०२.०१.२०१३.
२. जिल्हा पुरवठा अधिकारी नागपूर यांचे पत्र क्रमांक ९/ जिपुअ/ कलिगोदाम/ कावि / ४०९/ २०१४, दि.२१.११.२०१४.

प्रस्तावना-

सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत अन्नधान्याच्या साठवणुकीसाठी पुरेश्या गोदाम बांधकामाचा कार्यक्रम नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासनाने हाती घेतला आहे. त्याअंतर्गत दि.२ जानेवारी, २०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये उमरेड जि.नागपूर येथील गोदामाच्या रु.१,६६,५३,९०१/- इतक्या खर्चाच्या मूळ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. सदर उमरेड जि.नागपूर येथील अंदाजपत्रक सन २०११-१२ चे दरसूचीवर आधारित असून उक्त गोदाम बांधकामाची जागा खोलगट व पाणी साचणारी असल्याने तसेच सदर जागेत पश्चिमेकडे नाला वाहत असल्याने जोता पातळी उंच निश्चित करुन गोदामाची जागा पूर्वेकडे स्थानांतरीत करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने आर.सी.सी.संकल्पन करण्यात आले असून अंदाजित खर्चात वाढ अपेक्षीत आहे. सदर कामे केल्याशिवाय बांधकामाचा वापर करता येणार नसल्याने तसेच उपरोक्त कारणे व बाबी या वस्तुस्थितीवर आधारित असल्याने जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर यांनी संदर्भीय क्र.२ च्या पत्रान्वये उमरेड जि.नागपूर येथील गोदाम बांधकामाच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने उमरेड जि.नागपूर येथील रु. २,४४,१४,२६४/- (रु. दोन कोटी चव्वेचाळीस लक्ष चौदा हजार दोनशे चौसष्ट फक्त) खर्चाच्या गोदाम बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, शासन निर्णय दि.२ जानेवारी, २०१३ अन्वये प्रशासकीय मान्यता दिलेल्या उमरेड जि.नागपूर येथील १८०० मे.टन क्षमतेच्या गोदाम बांधकामाच्या रु.२,४४,१४,२६४/- (दोन कोटी चव्वेचाळीस लक्ष चौदा हजार दोनशे चौसष्ट फक्त) एवढया रकमेच्या अंदाजपत्रकास पुढील अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर गोदम बांधकाम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे. पुन्हा सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी मागणी करण्यात येणार नाही.

२. संदर्भाधीन दि. २ जानेवारी, २०१३ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केलेल्या अट क्र.अ व ६ ,८ ते ११ यांचे पालन करण्यात यावे.

सदर गोदाम बांधकामाचा खर्च उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष '४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्य्रक्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१)(०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल)(योजनेंतर्गत) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८१/का-१४७५, दि.२.७.२०१६ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८५/१७/व्यय-४, दि.६.३.२०१७ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२११७०३२८८४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Deoman Baswant

Digitally signed by Sunil Deoman Baswant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P. Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8883fe608dc825b4f80204357f8a6fadfe8507e0636b91f3c5fefef9c43acfe1, cn=Sunil Deoman Baswant
Date: 2017.03.21 17:06:08 +05'30'

**( सु.दे.बसवंत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. जिल्हाधिकारी, नागपूर.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
४. सहसचिव (नापु-१६ब), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
५. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
६. उप आयुक्त (पुरवठा), नागपूर.
७. जिल्हा पुरवठा अधिकारी, नागपूर.
८. कार्य्रकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
१३. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय,अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१५. सहाय्यक संचालक (संगणक) लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१६. उपमहाव्यवस्थापक,नाबार्ड,५४,वेलस्ली रोड,शिवाजीनगर पुणे ४११००५.
१७. निवड नस्ती/नापु-१६ब.